**ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता प्रकल्पाचे (जलस्वराज्य) माध्यमातून तज्ञ मनुष्यबळ विकसित करण्यासाठी निवडक प्रशिक्षणार्थींना (Apprentice) प्रशिक्षण देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्रं जस्वप्र-२००४/प्र.क्र.३९६६/पापु-११
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : २४ ऑगस्ट, २००४

प्रस्तावना :

राज्य शासनाने ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रात गेल्या ४ वर्षा पासून मागणी आधारित व समूह सहभाग तत्वावर विकेंद्रित पध्दतीने ग्रामीण स्तरावर पाणी पुरवठा व स्वच्छतेच्या सेवा लाभार्थीना सुलभपणे उपलब्ध व्हावे म्हणून नवीन पुरोगामी धोरण आंगिकारले आहे. त्याच धोरणावर आधारित महाराष्ट्र ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता प्रकल्प (जलस्वराज्य प्रकल्प) जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने राज्यातील २६ जिल्हयांमध्ये राबविण्यात येत आहे. या धोरणातंर्गत शासन यंत्रणा, जिल्हा परिषद व इतर पूरक भूमिका आंगिकारणाऱ्या अनुषगीक यंत्रणांना आपल्या कामाच्या पध्दतीमध्ये मुलभूत बदल करावा लागणार आहे. " सेवा पुरवठा करणाऱ्या संस्था " ऐवजी ग्रामस्थांनी या सेवा स्वतः उपलब्ध करुन घ्याव्यात म्हणून त्याची क्षमता विकसित करुन घेण्यासाठी या सर्व यंत्रणांची भूमिका या पुढे " सहाय्य कर्त्याची " म्हणून विकसित करावी लागणार आहे. त्यामुळे सहाजिकच मोठया प्रमाणावर या नवीन विचाराशी सुसंगत असे मनुष्यबळ विकसित करावे लागेल. सध्या या सर्व यंत्रणात काम करणारे कर्मचारी व अधिकाऱ्यांना त्या दृष्टिने पूरक भूमिका घ्यावी लागेल व त्यासाठी समर्पक प्रशिक्षण घ्यावे लागणार आहे. त्या दृष्टिने जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत मोठया प्रमाणावर तरतूद करण्यात आलेली आहे.

२. परंतु अशा प्रकारे नव्या भूमिकेतून काम करणारे मनुष्यबळ सध्याच्या यंत्रणेतून विकसित करण्याबरोबरच खुल्या बाजारातूनही असे मनुष्यबळ मोठया प्रमाणावर विकसीत व्हावे म्हणून व्यवस्था करणे आवश्यक आहे. कारण अशा प्रकारचे मनुष्यबळ यापुढे केवळ शासकीय, निमशासकीय, जिल्हा परिषदां अशा यंत्रणेमधून आवश्यक राहणार नाही तर या प्रकल्पामध्ये अनुषंगीक भूमिका बजावणाऱ्या सेवाभावी संस्था, खाजगी संस्था, सेवा पुरवठादार, प्रशिक्षण संस्था अशा संस्थांमध्येही आवश्यक राहणार आहे. यासाठी शैक्षणिक अर्हता प्राप्त करणे बरोबरच अशा प्रकारचे जे प्रकल्प राज्यात सुरु आहेत त्या प्रकल्पामध्ये योग्य शैक्षणिक अर्हता प्राप्त करणाऱ्या उमेदवारांना या नवीन धोरणावर आधारित

प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या कालावधीत सहभागी केले तर या नवीन धोरणानुसार काम करण्याची त्यांची क्षमता प्रगल्भ होवून निश्चित वाढील लागेस व भविष्यात सर्व यंत्रणांना अशा नवीन धोरणानुसार काम करणारे आवश्यक मनुष्यबळ सहज उपलब्ध होऊ शकेल. त्यामुळे अशा उमेदवारांना अनुभव प्राप्त होऊन त्यांना भविष्यात नेमणूक दिल्यानंतर पुन्हा त्यांच्या प्रशिक्षणावर वेळ व खर्च करावा लागणार नाही. प्रकल्पात प्रत्यक्ष उमेदवारी करताना प्रशिक्षित झालेले मनुष्यबळ त्यांना वरील पैकी कोणत्याही यंत्रणेतील नेमणुकीनंतर त्वरीत या नवीन पध्दतीने काम करण्यास उपलब्ध होऊ शकेल. त्याच बरोबर अशा प्रशिक्षित उमेदवारांना, सेवाभावी संस्था, खाजगी सेवा पुरवठादार अशा यंत्रणामध्ये त्यांच्या प्राप्त प्रत्यक्ष प्रशिक्षणामुळे काम करण्याची जादाची संधी उपलब्ध होण्याबरोबरच अर्धकुशल व्यावसायीक (Para Professional) म्हणून स्वतंत्रपणे आपल्या सेवा खुल्या बाजारातून ग्रामपंचायतींना अथवा इतर लाभधारक समूहांना उपलब्ध करुन देवू शकतील. यातून एकीकडे प्रशिक्षित मनुष्यबळ उपलब्ध होण्यात वाढ होतानाच स्वयंम् रोजगाराचा एक नवीन मार्ग त्यांना उपलब्ध होऊ शकेल. या दृष्टिने जलस्वराज्य प्रकल्पात अशा कांही प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्याच्या दृष्टिने काही कालावधी करिता सधी द्यावी व या नवीन धोरणासाठी आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्याचा एक नवीन मार्ग उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता प्रकल्पातून (जलस्वराज्य प्रकल्प) नवीन मागणी आधारित, समुह सहभाग तत्वावर व पध्दतीने काम करण्यासाठी आवश्यक मनुष्यबळ विकसित होऊन भविष्यात सेवाभावी संस्था, ग्रामपंचायती, जिल्हा परिषदा, खाजगी सेवा पुरवठादार व शासकीय यंत्रणांना आवश्यकता भासल्यास सहज उपलब्ध व्हावे म्हणून, तसेच अशा प्रशिक्षिणार्थींना या नवीन धारेणातंर्गत स्वयंम् रोजगाराची संधी उपलंब्ध व्हावी म्हणून जलस्वराज्य प्रकल्पाच्या अंमलबजावणी कालावधीत योग्य शैक्षणिक अर्हता पूर्ण करणाऱ्या निवडक उमेदवारांना " On the job" अशा प्रकारचे प्रत्यक्ष प्रशिक्षण उपलब्ध व्हावे म्हणून त्यांना किमान ६ महिने व कमाल ११ महिन्याची प्रशिक्षार्थी नेमणूक देण्यात यावी.

राज्यातील विविध शैक्षणिक संस्थांकडून विशेष अर्हता धारण करणाऱ्या उमेदवारांची अथवा राज्य शासनाच्या सेवा योजन कार्यालयातून यादी मागवून त्यातून योग्य व निवडक उमेदवारांना असे प्रशिक्षण देण्यात येईल. हे प्रशिक्षण उपलब्ध करुन देण्यासाठी जलस्वराज्य प्रकल्पातील गठीत राज्य स्तरावरावरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षात (RSPMU) अथवा प्रकल्पात अंतर्भूत विविध जिल्हयातील या प्रकल्पासाठी गठीत विविध चमूंसोबत त्यांना attachment देण्यात येईल.

२.	या कालावधीत या प्रशिक्षणार्थींना कमाल दरमहा रु.५०००/- (रुपये पाच हजार फक्त) पर्यंत प्रशिक्षण भत्ता उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच या प्रशिक्षणासाठी प्रशिक्षण घेण्यासाठी अभ्यास भेटीस्तव दौरा करावा लागला तर शासनाच्या वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांना ज्या दराने प्रवासभत्ता उपलब्ध करुन देण्यात येतो तो उपलब्ध करुन देण्यात येईल.

३.	मात्र या प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण संपल्यानंतर शासकीय यंत्रणेत, निमशासकीय यंत्रणेत, जिल्हा परिषदा, ग्रामपंचायती किंवा इतर तत्सम संस्थामध्ये नियमित स्वरुपात नेमणूका मागण्याचा हक्क असणार नाही. परंतु अशा उमेदवारांना भविष्यात नेमणूक करण्यासाठी तो अलहिदा पात्र असल्यास त्यांचा प्राधान्याने विचार करण्यात येईल.

४.	विविध शैक्षणिक संस्था व राज्य शासनाच्या सेवा योजन खात्यातील यादीमधून योग्य प्रशिक्षणार्थींना placement देण्यासाठी निवड करण्यास्तव जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत राज्यस्तरावर खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रकल्प व्यवस्थापक (सुसप्रव्यक) | - | अध्यक्ष |
| २) | संस्थीय व समाज विकास तज्ञ | - | सदस्य |
| ३) | वित्तीय सल्लागार | - | सदस्य |
| ४) | समाज विकास तज्ञ | - | सदस्य |
| ५) | आदिवासी विकास तज्ञ | - | सदस्य |
| ६) | संनियंत्रण व मुल्यांकन तज्ञ | - | सदस्य |
| ७) | प्रशासन अधिकारी (सुसप्रव्यक) | - | सदस्य सचिव |

५.	प्रशिक्षण कालावधीत उमेदवारांना वर नमूद केल्यानुसार प्रशिक्षण भत्ता व प्रवास भत्त्याशिवाय इतर कोणत्याही सोयीसुविधा उपलब्ध असणार नाहीत. सुरुवातीला या पध्दतीने कमाल २० प्रशिक्षणार्थींची निवड करुन त्यांना असे प्रात्यक्षिक रुपाने प्रशिक्षण देण्यासाठी व प्रशिक्षण कालावधी कमाल ११ महिन्यापर्यंत ठेवण्यास मान्यता देण्यात येते. प्रशिक्षणार्थींचा प्रशिक्षण कालावधी वरील कमाल मर्यादेच्या अधीन किती असावा याबाबतचा निर्णय वर नमूद केलेली समिती घेईल. तसेच प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थी योग्य पध्दतीने प्रशिक्षण घेत आहे याचे संनियंत्रण करील. त्यांची वर्तणूक अयोग्य आढळून आल्यास, त्यांची प्रशिक्षणार्थी म्हणून केलेली निवड कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द करण्याचा अधिकार वरील समितीला असेल.

६. सुरुवातीला प्रशिक्षणार्थी म्हणून जलस्वराज्य प्रकल्पात नेमणूक करण्यासाठीची उपरोक्त पध्दत या आदेशाच्या दिनांकापासून २ वर्षासाठी राहील. आवश्यकते प्रमाणे शक्ती प्रदान समितीच्या मान्यतेने ती पुढे वाढविता येईल.

७. हा निर्णय जलस्वराज्य प्रकल्पासाठी गठीत शक्ती प्रदान समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

(सुधीर ठाकरे)
उप सचिव व संचालक (सुसप्रव्यक)

प्रत,

- प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
- प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई , यांचे स्वीय सहाय्यक.
- प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहाय्यक.
- प्रधान सचिव , ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.
- उप सचिव व संचालक (सुसप्रव्यक) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- उप सचिव (आस्था.) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- प्रकल्प व्यवस्थापक (सुसप्रव्यक) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सिडको भवन, नवी मुंबई.
- वित्तीय सल्लागार, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सिडको भवन, नवी मुंबई.
- मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-०१, मुंबई.
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-०२, नागपूर.
- संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
- अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई/बांद्रा.
- सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
- जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
- लेखा अधिकारी, भारतीय रिझर्व बँक, मुंबई/बेलापूर, नवी मुंबई.
- निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
- वित्त विभाग (व्यय-२), (अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.
- नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
- सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील सर्व अधिकारी व कर्मचारी.
- रोख शाखा (सुसप्रव्यक), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, कार्यसन क्र.पापु.११